**मौजे कोपर्डी, ता.कर्जत, जि.अहमदनगर येथे आरोग्य उपकेंद्र स्थापन करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण २०१६/ प्र.क्र.२२५/ आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १० जानेवारी, २०१७

**प्रस्तावना -**

शासनाच्या धोरणानुसार बिगर आदीवासी क्षेत्रात उपकेंद्र स्थापनेसाठी त्या अंतर्गत ५००० लोकसंख्या आवश्यक आहे. मौजे कोपर्डी ता.कर्जत जि.अहमदनगर हे गाव बिगर आदीवासी क्षेत्रात येत असून येथील लोकसंख्या ५००० पेक्षा कमी असल्याने शासनाच्या धोरणानुसार उपकेंद्रासाठी पात्र ठरत नाही. तथापि, या ठिकाणी एक विशेष बाब म्हणून आरोग्य उपकेंद्र स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मौजे कोपर्डी, ता.कर्जत, जि.अहमदनगर येथे " खास बाब" म्हणून आरोग्य उपकेंद्र स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर आरोग्य उपकेंद्रासाठी विहित पध्दतीने जागा अधिग्रहीत करुन सदर जागेवर आरोग्य उपकेद्रांचे बांधकाम करण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११०१६५५०६६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2017.01.10 17:54:07 +05'30'

**( विवेक दहिफळे )**
सह सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा(प्राआकेंद्र -जिपस्तर), पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, अहमदनगर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
१०.नियोजन विभाग,(का.१४७२) मंत्रालय,मुंबई
११.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
१२.निवडनस्ती (आरोग्य-३)